**राजर्षि शाहू महाराज चरित्र साधने प्रकाशन समितीचे पुनर्गठन करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन निर्णय, क्रमांक : समिती-२०२०/प्र.क्र.५०/आस्था-२,**
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई -४०००३२
**दिनांक : २० एप्रिल, २०२२**

वाचा :-

१) उच्च व तंत्र शिक्षण विभाग, शासन निर्णय, क्रमांक-डीबीए-२००८/(८६/०८)/समन्वय, दि.३०.०९.२००८

२) उच्च व तंत्र शिक्षण विभाग, शासन निर्णय, क्रमांक-समिती-१११९/(९१/१६ )/समन्वय, दि.२७.०१.२०२०

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्राच्या वैचारिक, सामाजिक, राजकीय व शैक्षणिक बांधणीत राजर्षि शाहू महाराज यांचे योगदान आहे. आजही राजर्षि शाहू महाराज यांच्या कार्यकर्तृत्वाचा आणि राजकीय, सामाजिक प्रयोगांचा नमुनादर्शक उपयोगी पडू शकतो. महाराष्ट्र शासनाने राज्याच्या पुरोगामित्वाची जडणघडण करण्यास प्रेरणादायी ठरलेल्या या आदिनेत्याची ओळख जागविण्यासाठी विशेष कृती-प्रकल्प हाती घ्यावा, या उद्देशाने राजर्षि शाहू महाराज चरित्र साधने प्रकाशन समितीची स्थापना उपरोक्त क्र.१च्या शासन निर्णयान्वये करण्यांत आली होती. या समितीची मुदत दिनांक २७.०१.२०२० रोजी समाप्त झाली. आगामी काळात राजर्षि शाहू महाराज यांचे जीवनावर आधारित इतर साहित्याचे संकलन, संपादन, प्रकाशन करण्याकरीता राजर्षि शाहू महाराज चरित्र साधने प्रकाशन समितीचे पुनर्गठन करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

राजर्षि शाहू महाराज यांची ग्रंथसंपदा प्रकाशित करण्यासाठी खालीलप्रमाणे राजर्षि शाहू महाराज चरित्र साधने प्रकाशन समिती, मुंबईचे पुनर्गठन करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

| नियुक्त करावयाचे शासकीय/अशासकीय सदस्य. | पद |
|---|---|
| १) मा. मंत्री (उच्च व तंत्र शिक्षण) | अध्यक्ष |
| २) मा. राज्यमंत्री (उच्च व तंत्र शिक्षण) | उपाध्यक्ष |
| ३) अ.मु.स./प्रधान सचिव/सचिव (उच्च व तंत्र शिक्षण) | सदस्य |
| ४) संचालक, उच्च शिक्षण महराष्ट्र राज्य, पुणे. | निमंत्रक |
| ५) संचालक, शासकीय मुद्रणालय, लेखा सामग्री व प्रकाशन, मुंबई. | सदस्य |
| ६) डॉ. प्रकाश पवार, कोल्हापूर. | सदस्य |
| ७) श्री. रमेश चव्हाण, कोथरुड, पुणे. | सदस्य |
| ८) डॉ. रविंद्र रुक्मिणी पंढरीनाथ, सेवाग्राम, जिल्हा वर्धा. | सदस्य |
| ९) डॉ. सोनाली रोडे, सहसंचालक, उच्च शिक्षण, मुंबई विभाग | सदस्य |
| १०) डॉ. शैलेंद्र खरात, सावेवाडी, औंध, पुणे. | सदस्य |
| ११) डॉ. मंजुश्री जयसिंगराव पवार, कोल्हापूर. | सदस्य |
| १२) श्री. प्रभाकर अश्रोबा ढगे, पणजी, गोवा. | सदस्य |
| १३) डॉ. दत्तप्रसाद दाभोळकर, सदर बझार, सातारा, जिल्हा सातारा. | सदस्य |
| १४) डॉ. दत्ता पवार, भांडूप (प.), मुंबई. | सदस्य |
| १५) डॉ. नारायण भोसले, मुंबई. | सदस्य |
| १६) प्रा. राजेश्वरी देशपांडे, राज्यशास्त्र विभाग, सावित्रीबाई फुले पुणे विद्यापीठ, पुणे. | सदस्य |
| १७) श्री. राम जगताप, डोंबिवली (पूर्व), जिल्हा ठाणे. | सदस्य |
| १८) श्री. राजेंद्र साठे, दहिसर (पूर्व), मुंबई. | सदस्य |

१९) डॉ. राजहंस कपील अनारपिंड, हुपरी, हातकणंगले, जिल्हा कोल्हापूर. सदस्य
२०) डॉ. विजय चोरमारे, मुलूंड (पूर्व), मुंबई. सदस्य-सचिव

२. राजर्षि शाहू महाराज चरित्र साधने प्रकाशन समितीची मुदत प्रारंभी तीन वर्षेपर्यंत राहील.

३. राजर्षि शाहू महाराज चरित्र साधने प्रकाशन समितीची उद्दीष्टे व सदस्य सचिवांची कार्यकक्षा खालीलप्रमाणे राहील:-

अ) राजर्षि शाहू महाराज यांचे समग्र वाङमय प्रसिद्ध करुन त्याचे हिंदी, इंग्रजी आदि भाषांमध्ये प्रकाशित करणे.

ब) राजर्षि शाहू महाराज यांचे अद्ययावत सप्रमाण चरित्र लिहून, त्याचे हिंदी, इंग्रजी आदि भाषांमध्ये भाषांतर करणे व प्रसिद्ध करणे.

क) राजर्षि शाहू महाराज यांचे जीवन कार्यावरील तसेच समिक्षापर साहित्य प्रकाशित करणे.

ड) राजर्षि शाहू महाराज यांच्या अप्रकाशित साहित्याचे संकलन व संपादन करणे.

ई) राजर्षि शाहू महाराज यांच्या प्रकाशित साहित्याचे संशोधन करणे.

फ) शासन निर्णय क्र. डिबीए-२००८/(८६/०८)/समन्वय, दि.१८/१०/२००९ अन्वये सदस्य सचिवांच्या कामकाजाबाबत जी मार्गदर्शक तत्वे निश्चित करण्यात आलेली आहेत. तीच मार्गदर्शक तत्वे या समितीच्या सदस्य सचिवाची राहतील. सदर समितीच्या कामकाजाकरीता आवश्यक पदे याबाबतच्या तरतुदी उच्च व तंत्र शिक्षण विभाग, शासन निर्णय, क्रमांक-१११९/(८१/१६)/समन्वय, दिनांक १७ ऑक्टोबर, २०१६ प्रमाणे राहतील.

४. सदर समितीचे अशासकीय सदस्य/सदस्य-सचिव यांना वित्त विभाग, शासन निर्णय क्र:प्रवास-१०१०/ प्र.क्र.२/सेवा-५, दिनांक ०३ मार्च, २०१० नुसार अनुज्ञेय असलेला प्रवास भत्ता व दैनिक भत्ता तसेच, वित्त विभाग, शासन निर्णय क्र:बैठक-२०१२/प्र.क्र.१/सेवा-५, दिनांक २४ मे, २०१२ नुसार अनुज्ञेय असलेला बैठक भत्ता लागू राहील. याशिवाय शासन निर्णय, क्र. डीबीए-२००९/(२९०/०९)/समन्वय, दिनांक १३ एप्रिल, २०१० नुसार सदर समितीचे सदस्य-सचिव यांना मानधन देय राहील.

५. वरीलप्रमाणे मंजूर करण्यात आलेला खर्च मागणी क्र. एन-३, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग ७८९, अनुसूचित जातीसाठी विशेष सहाय्य योजना (०१) अनुसूचित जाती घटक कार्यक्रमांतर्गत योजना (०१) (०१) थोर राष्ट्रीय पुरषांच्या साहित्याचे प्रकाशन (कार्यक्रम) लेखाशीर्ष-(२२०५ ३६२६)" या लेखाशीर्षाखालील उपलब्ध तरतूदीतून भागविण्यात यावा.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासन www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२२०४२०१२१५४१६९०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्र राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by PRATAP PANDURANG LUBAL
Date: 2022.04.20 12:17:19 +05'30'

**(प्रताप पां. लुबाळ)**
**उपसचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मुंबई.
२) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) मा. उपमुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.

४) मा. मंत्री (उ.व तं.शि.) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५) मा. राज्यमंत्री (उ.व तं.शि.) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
६) मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
७) प्रधान सचिव (उ.व तं.शि.), मंत्रालय, मुंबई.
८) सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग (कार्यासन विघयो) मंत्रालय,
९) वित्त विभाग (व्यय-५/व्यय-१४) मंत्रालय, मुंबई.
१०) संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
११) सहसंचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
१२) राजर्षि शाहू महाराज चरित्र साधने प्रकाशन समितीचे सदस्य-सचिव ( संचालक, उच्च शिक्षण, पुणे यांचेमार्फत)
१३) राजर्षि शाहू महाराज चरित्र साधने प्रकाशन समितीचे सर्व सदस्य (संचालक, उच्च शिक्षण, पुणे यांचेमार्फत)
१४) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-I, II, मुंबई/नागपूर.
१५) महासंचालक, माहिती व जनसंपर्क, मंत्रालय, मुंबई त्यांना विनंती आहे की, प्रस्तुत शासन निर्णयाला व्यापक प्रसिद्धी तात्काळ द्यावी.
१६) निवडनस्ती (आस्था-२)